**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील महत्वाच्या स्थळांचा विकास करणे या योजनेंतर्गत भिक्खू संघ युनायटेड बुध्दिष्ट मिशन, टिळक नगर, चेंबुर या संस्थेस सोशल एज्युकेशन ॲण्ड कल्चरल सेंटरच्या बांधकामाकरीता निधी मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्वंसेअं-२०१८/प्र.क्र.३६१/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०६ नोव्हेंबर, २०१९.

<u>वाचा :</u>-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१६.१२.२०१५.
२) शासन शुध्दिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.०५.०३.२०१९.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन पत्र, क्र. बैठक-२०१८/ प्र.क्र.३२९/ बांधकामे, दि.२२.११.२०१८ चे इतिवृत्त.
४) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/मावक/ऐति.स्थळ/२०१८-१९/का-१२/७६३७, दि.१६.१०.२०१८.

**<u>प्रस्तावना</u> : -**

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मान्यवर व्यक्तींची स्मारक बांधणे तसेच महत्वाच्या सांस्कृतिक व ऐतिहासीक स्थळांचा विकास करण्याच्या दृष्टीने स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्या विषयीचे निकष व मार्गदर्शक तत्वांना संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या विहित कार्यपध्दती नुसार संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये, आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी भिक्खू संघ युनायटेड बुध्दिष्ट मिशन, टिळक नगर, चेंबुर या संस्थेचा चेंबुर, मुंबई येथे सोशल एज्युकेशन ॲण्ड कल्चरल सेंटर बांधणेबाबतचा रु.९१,२०,०००/- (अक्षरी रुपये एक्यान्नव लक्ष वीस हजार फक्त) इतक्या रकमेचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाचे अंदाजपत्रक व आराखडा उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम कुर्ला उपविभाग, मुंबई यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई सार्वजनिक बांधकाम विभाग, अंधेरी, मुंबई यांनी साक्षांकित केले आहे. मा.मंत्री, (सा.न्या.व वि.स.) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीच्या दि. २४.१०.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्यात आली होती. तदनुषंगाने सदर प्रस्तावाच्या रु.९१,२०,०००/- (अक्षरी रुपये एक्यान्नव लक्ष वीस हजार फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी भिक्खू संघ युनायटेड बुध्दिष्ट मिशन, टिळक नगर, चेंबुर या संस्थेचा चेंबुर, मुंबई येथे सोशल एज्युकेशन ॲण्ड कल्चरल सेंटर बांधणेबाबतचा रु.९१,२०,०००/- (अक्षरी रुपये एक्यान्नव लक्ष वीस हजार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाकडे तांत्रिक बाबींची छाननी करण्याकरिता सादर केले असता सार्वजनिक बांधकाम विभागाने सदर अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यतेसह प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दर्शविली आहे. त्यानुषंगाने भिक्खू संघ युनायटेड बुध्दिष्ट मिशन, टिळक नगर, चेंबुर या संस्थेचा चेंबुर, मुंबई येथे सोशल एज्युकेशन ॲण्ड कल्चरल सेंटर बांधणेबाबतचा रु.९१,२०,०००/- (अक्षरी रुपये एक्यान्नव लक्ष वीस हजार फक्त) इतक्या रकमेस खालील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. एकूण अंदाजपत्रकीय खर्चामध्ये शासनाचा हिस्सा ९० टक्के इतका व संबंधित संस्थेचा हिस्सा १० टक्के इतका असेल. :-

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ ता.क्र.१, दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
५) प्रस्तावित बांधकामाची जागा सदर संस्थेच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.
६) प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यापूर्वी अंदाजपत्रकावर अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई व विभागाच्या वतीने प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई यांनी साक्षांकन करावे.
७) सदर वास्तुचे हस्तांतरण इतर संस्थेला करता येणार नाही किंवा जागेची व वास्तुची खरेदी विक्री करता येणार नाही.
८) सदर वास्तुचा उपयोग व्यापारी म्हणून करता येणार नाही किंवा लग्न समारंभ इत्यादी बाबीसाठी करता येणार नाही.
९) शासनाच्या काही कार्यक्रमासाठी वा उपक्रमासाठी उपरोक्त वास्तुचा विनाशुल्क उपयोग करता येईल.

२. संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयात नमूद मार्गदर्शक तत्वांचे पालन करुन भिक्खू संघ युनायटेड बुध्दिष्ट मिशन, टिळक नगर, चेंबुर या संस्थेचा चेंबुर, मुंबई येथे सोशल एज्युकेशन ॲण्ड

कल्चरल सेंटरचे बांधकाम करणे या कामावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी सदर शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीची राहील. वर नमूद सर्व अटी व शर्ती भिक्खू संघ युनायटेड बुध्दिष्ट मिशन, टिळक नगर, चेंबुर यासंस्थेला मान्य असल्याबाबत करारपत्र करुन घ्यावे. शासनाच्या वतीने करारपत्रावर सही करण्यासाठी प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई शहर यांनी बांधकामाच्या सद्य:स्थितीचा त्रैमासिक अहवाल आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना वेळीच सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर बांधकामावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या वर्षात मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर योजनेअंतर्गत आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१९११०६१७३६२३४५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2019.11.06 17:39:28 +05'30'

(अनिल कों. आहिरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.

५) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई सार्वजनिक बांधकाम विभाग, अंधेरी, मुंबई

६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.

७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई.

८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई शहर.

९) जिल्हाकोषागार अधिकारी,मुंबई शहर.

१०) अध्यक्ष, भिक्खू संघ युनायटेड बुध्दिष्ट मिशन, टिळक नगर, चेंबुर

११) निवडनस्ती (का-बांधकामे).